"महत्वाच्या रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे
दुतर्फा वृक्ष लागवड करणे " या योजनेकरीता
सन २०१५-१६ मध्ये निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्र. साववि-२०१५/प्र.क्र. ९५/ फ-११
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक - २१.०९.२०१५

संदर्भ :-

१) शासन निर्णय क्रमांकः अंदाज -२०१५/प्र.क्र.३६/फ-११, दि. १६ जून, २०१५ .

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/प्र.क्र. ४७/१४-१५/१६७६/१५-१६, दि. ११/९/२०१५.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक-२०१५/प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३, दि.११ सप्टेंबर, २०१५

प्रस्तावना -

मानव आणि निसर्ग यांचा अनन्यसाधारण असा संबंध आहे. वृक्षाच्छादन वाढवून निसर्ग सौंदर्यात भर घालणे आणि त्यातून सुरक्षित पर्यावरणाचा अमूल्य ठेवा पुढील पिढीला हस्तांतर करण्यासाठी सद्याच्या पिढीने अतिशय जागरुकतेने काम करण्याची आवश्यकता आहे. सद्य:स्थितीत जागतिक तापमानात होत असलेली वाढ (Global Warming), वातावरणातील बदल (Climatic Change) आणि पर्यावरणीय बदलास लोक जीवनास सामोरे जावे लागत आहे. या सर्वांची तीव्रता कमी करण्याच्या उद्देशाने शासनाने हरित महाराष्ट्र ही संकल्पना अंमलात आणली आहे.

या योजनेचा भाग म्हणून आणि सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन राज्यामध्ये वनक्षेत्र आणि वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी " महत्वाचे रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे दुतर्फा वृक्ष लागवड करणे" ही योजना राज्यात राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेनंतर संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयाद्वारे सदर योजनेची सन २०१५-१६ पासून अंमलबजावणी करण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

वर नमूद योजनेद्वारे वृक्षाचे नैसर्गिक पुर्नजीवन करण्याबरोबरच प्राणी, पशु,पक्षी, किटक यांना नैसर्गिक अन्न साखळी द्वारे फळफळाव/खाद्य आणि नैसर्गिक आधिवास निर्माण करुन त्यातून जैवविविधता टिकविणे आणि वाढविणे हा देखील उद्देश आहे. त्याचबरोबर प्रवास करताना तो अधिक आल्हादायक आणि निसर्ग सानिध्यात व्हावा हा देखील उद्देश यातून साधला जाणार आहे. या योजनेचे स्वरुप आणि उद्दीष्टे सध्या अस्तित्वात असलेल्या "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन कार्यक्रम" या योजनेशी मिळताजुळता आहे. त्यानुसार सदर योजना वन विभागामध्ये सध्या सुरु असलेल्या "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन कार्यक्रम" या योजनेमध्ये समाविष्ट करण्यास आणि या योजनेसाठी मंजूर असलेला नियतव्यय त्या लेखाशिर्षांतर्गत वळती करण्यास संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

या योजनेतंर्गत हाती घ्यावयाच्या कामासंदर्भात महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांनी स्थळनिश्चिती केली असून, प्रचलित मापदंडानुसार सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात आले असल्याचे महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग यांनी संदर्भ क्र. २ येथे नमूद पत्रान्वये कळविले आहे. त्याचबरोबर या योजनेतंर्गत हाती घ्यावयाच्या कामांच्या अनुषंगाने तयार करण्यात आलेले प्रत्येक सविस्तर अंदाजपत्रक आणि नकाशे यास सक्षम प्राधिकाऱ्यांने तांत्रिक मंजूरी आणि प्रशासकीय मान्यता दिली

असल्याचे देखील महासंचालकांनी या पत्रात नमूद केले आहे. त्यानुसार या योजनेस सन २०१५-१६ मध्ये निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणा-या **"महत्वाच्या रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे दुतर्फा वृक्ष लागवड करणे "** या योजनेकरिता रु.५००.०० लक्ष इतका निधी जुलै,२०१५ मधील पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. वितरित करावयाच्या निधीसंदर्भातील माहे सप्टेंबर,२०१५ ते मार्च,२०१६ मधील कॅश फ्लोबाबतचे **विवरणपत्र- १** सोबत जोडले आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक,सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेतंर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मार्फत व्हावे.

४. सदर योजनेतंर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ मध्ये मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्र.सी-१०- ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यांवरील भांडवली खर्च -०१ वनीकरण-१०१, वनसंरक्षण, विकास व पुर्ननिर्मिती- (००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम **(४४०६ ०४९२) "महत्वाच्या रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे दुतर्फा वृक्ष लागवड करणे."**

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. ३ येथे नमूद वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पूरक-२०१५/ प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३ दि. ११ सप्टेंबर, २०१५ मधील सूचनांनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२११५४२०४४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.09.21 15:45:48 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
सह सचिव, (वने)

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.

३. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग.
६. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग.
७. सचिव (वने), महसूल व वन विभाग.
८. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग.
९. सचिव, (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय.
१०.सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग.
११.सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग.
१२. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१३.प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख ),नागपूर.
१४. सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक, वन विभाग.
१५. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, वन विभाग.
१६.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१७. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
१९. सर्व मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव), वन विभाग.
२०. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
२१. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
२२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
२४. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
२५. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प- ०६ मंत्रालय, मुंबई-३२
२६. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२७. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२८. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२९. निवडनस्ती/फ-११.

विवरणपत्र १-

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. साववि-२०१५/प्र.क्र. ९५/ फ-११, दिनांक २१.०९.२०१५.**

योजनेचे नांव - महत्वाच्या रस्ते, कालवे व रेल्वे लाईन यांचे दुतर्फा वृक्ष लागवड करणे

(रु.लाखात)

| सविस्तर शीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | सप्टेंबर, २०१५ | ऑक्टोबर, २०१५ | नोव्हेंबर, २०१५ | डिसेंबर, २०१५ | जानेवारी, २०१६ | फेब्रुवारी , २०१६ | मार्च, २०१६ | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०२- मजूरी | ४७७.०७ | ०.०० | १६६.८० | १५०.६० | १५९.६७ | ०.०० | ०.०० | ०.०० | ४७७.०७ |
| २१- पुरवठा व सामग्री | २२.९३ | ०.०० | १३.९० | ९.०३ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | २२.९३ |
| एकूण | ५००.०० | ०.०० | १८०.७० | १५९.६३ | १५९.६३ | ०.०० | ०.०० | ०.०० | ५००.०० |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.09.21 15:46:05 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
सह सचिव, (वने)